उच्च व्यावसायिक व इयत्ता बारावीनंतर सर्व अभ्यासक्रमांमध्ये शिक्षण घेणाऱ्या राज्यातील अल्पसंख्यांक विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती योजना, सन २०१६-१७ साठी अनुदान वितरण करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : अविवि - २०१६/प्र.क्र.३३/१६/का-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : ३१ मार्च, २०१७

वाचा-

१) शासन निर्णय क्रमांक : अविवि-२०११/प्र.क्र.४४/११/का-६, दि. १४.१०.२०११
२) शासन निर्णय क्रमांक : अविवि-२०१५/प्र.क्र.६९/१५/का-६, दि. २९.०७.२०१५
३) शासन निर्णय क्रमांक : अविवि-२०१५/प्र.क्र.६९/१५/का-६, दि. ०६.०२.२०१५
४) शासन निर्णय क्रमांक : अविवि-२०१६/प्र.क्र.३३/१६/का-६, दि. २९.०४.२०१५
५) शासन निर्णय क्रमांक : अविवि-२०१६/प्र.क्र.३३/१६/का-६, दि. १९.०७.२०१६
६) शासन निर्णय क्रमांक : अविवि-२०१६/प्र.क्र.३३/१६/का-६, दि. २९.०३.२०१७

प्रस्तावना:-

राज्यातील अल्पसंख्याक समाजातील उच्च व्यावसायिक शिक्षण घेणाऱ्या व इयत्ता बारावीनंतर सर्व अभ्यासक्रमांकध्ये शिक्षण घेत असलेल्या आर्थिक दृष्टया कमकुवत व गुणवत्ताधारक विदयार्थ्यांकरिता शिष्यवृत्ती योजनेसाठी सन २०१६-१७ मध्ये रु.९०.०० कोटीची अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली असून वित्त विभागाच्या दि.२०/०४/२०१६ च्या परिपत्रकानुसार रु. ९०.०० कोटी पैकी रु. ७२.०० कोटी वितरणासाठी उपलब्ध होते. त्यापैकी रु. २२,९८,६९,५३९/- इतका निधी उपरोक्त नमूद क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये सन २०१५-१६ मध्ये शिष्यवृत्तीसाठी पात्र ठरलेल्या विदयार्थ्यांना शिष्यवृत्ती मंजूर करण्यासाठी संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई यांना वितरीत करण्यात आला आहे. त्यांनी या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केले आहे.संदर्भ क्रमांक ५ येथील शासन निर्णयाअन्वये सदर लेखा शिर्षाखालील मंजूर अनुदान रु. ७२.०० कोटी पैकी रु.४९,०१,३०,४६१/- इतके अनुदान सन २०१६-१७ साठी शिष्यवृत्तीसाठी पात्र ठरलेल्या विदयार्थ्यांना शिष्यवृत्ती मंजूर करण्याकरिता संचालक तंत्र शिक्षण संचालनालय यांना मंजूर करण्यात आले आहे.

२. सन २०१६-१७ च्या सुधारीत अंदाजा मध्ये वरील लेखाशीर्ष खाली रु ९०.०० कोटी इतकी तरतुद दर्शविण्यात आलेली आहे. त्यामुळे सदर लेखाशीर्षाखाली रु. १८.०० कोटी इतकी तरतूद वितरणासाठी उपलब्ध आहे.संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुबई यांना सन २०१६-१७ या आर्थिक वर्षासाठी अल्पसंख्याक विद्यार्थ्यांच्या शिष्यवृत्ती वाटपासाठी रु १६.६० कोटी इतक्या निधीचे वितरण शासन निर्णय समक्रमांक दिनांक २९/०३/२०१७ अन्वये करण्यात आलेले आहे.

३. यास्तव उपरोक्त रु.१८.०० कोटी इतक्या तरतूदीतून रु.१६.६० कोटी इतका निधी संचालक, वैधकीय शिक्षण आणि संशोधन, मुबई यांनी सन २०१६-१७ या आर्थिक वर्षासाठी अल्पसंख्याक विद्यार्थ्यांच्या शिष्यवृत्ती वाटपासाठी वितरीत केल्यानंतर रु १.४० कोटी इतका निधी शिल्लक आहे.

४. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई यांना सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात अल्पसंख्याक विद्यार्थ्यांच्या शिष्यवृत्ती वाटपासाठी रु. ३८,४३,९४,६७४/- इतक्या निधीची आवश्यकता आहे. त्यानुसार संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई यांना सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात अल्पसंख्याक विद्यार्थ्यांच्या

शिष्यवृती वाटपासाठी रु . ०१,४०,००,०००/- (रुपये एक कोटी चालीस लाख) इतका निधी वितरीत करण्यास या व्दारे मान्यता देण्यात येत आहे.

५. सन २०१६-१७ पासून ज्यू धार्मियांना देखील महाराष्ट्र शासनाने अल्पसंख्याक घोषित केले आहे. त्यांचा देखील समावेश करावा व पारशी कोटयामध्ये त्यांचा समावेश करावा. सदर योजनेंतर्गत सन २०१६-१७ या वर्षात रु. ०१,४०,००,०००/- कोटी (रुपये एक कोटी चालीस लाख )इतका निधी संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना वितरित करण्यास या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे. सन २०१६-१७ साठी शिष्यवृत्तीसाठी पात्र विदयार्थ्यांना शिष्यवृत्ती मंजूर करण्यासाठी सदर रक्कम त्यांच्या स्वाधीन करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक आधिकारी म्हणून काम पाहतील.

६. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी सन २०१६-१७ च्या वरील प्रमाणे दर्शविल्याप्रमाणे विहित मर्यादेपर्यंतच खर्च करावा. सदर निधीतून सन २०१६-१७ साठी नूतनीकरणसाठी अर्ज केलेल्या विद्यार्थ्यांना प्राथम्याने शिष्यवृत्तीचे वाटप करण्यात यावे. उपरोल्लेखित खर्चाचा तपशिल व उपयोगिता प्रमाणपत्र शासनास विहित कालावधीत सादर करावे. तसेच हे अनुदान खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्पिय नियमपुस्तिका व वित्तीय अधिकारी नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच वेळोवेळी शासनाने या अनुषंगाने दिलेले सर्व निर्देश/नियम/शासन निर्णय/आदेश आणि केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचना व नियंत्रक व महालेखापरिक्षक यांच्या निरीक्षणाने पालन करण्यात यावे. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम दि.१५/०५/२००९, अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारानुसार तसेच प्रधान सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग यांनी प्रशासनिक विभाग प्रमुख या नात्याने दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०/०४/२०१६ मधील परिच्छेद क्र.७ ते १८ मधील अटीची व त्यासोबतच्या परिशिष्टा मधील अ.क्र.३ व ९ मधील अटीची पूर्तता होत असून, सदर शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग शासन परिपत्रक क्र. बीयुडी-२०१५/प्र.क्र.४३ (भाग-१)/का-७,दि.२०/०४/२०१६ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर प्रयोजनासाठी होणारा खर्च “मागणी क्र. झेड ई-१,मुख्य लेखाशिर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (२०) उच्च शिक्षण घेणाऱ्या अल्पसंख्याक विद्यार्थ्यांकरिता शिष्यवृत्ती योजनेकरिता सहाय्यक अनुदान (२२३५-ए-३३८) ३१ सहायक अनुदान या लेखाशीर्षाखाली सन २०१६-१७ या वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३३११३४१५७३११४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sandesh Chhabu Tadvi

Digitally signed by Sandesh Chhabu Tadvi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=39e858554371a26f6672b036224cff0a48a63a836a4067a8da9a8cca6d83429e, cn=Sandesh Chhabu Tadvi
Date: 2017.03.31 16:08:34 +05'30'

(सं.छ.तडवी)
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव

२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव

३. मा. मंत्री / मा. राज्यमंत्री, अल्पसंख्याक विकास यांचे खाजगी सचिव
४. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
५. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
८. अपर मुख्य सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
११. संचालक, उच्च शिक्षण, उच्च शिक्षण संचालनालय, पुणे
१२. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई
१३. संचालक, वैद्यकीय शिक्षण संचालनालय, मुंबई
१४. निवड नस्ती कार्यासन -६.